**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**क्रमांकः उसप-१३१५/प्र.क्र.६/का.१४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: २८.०५.२०१५

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४(१), ४(२), व ४(३) अनुसार मंत्रालयीन संवर्गातील खाली नमूद केलेल्या उप सचिवांची बदली करण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या विभागामध्ये त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे. -

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नाव /पदनाम | सध्याचा विभाग | बदलीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री पां.जो.जाधव,उ.स. | सामान्य प्रशासन विभाग | नगर विकास विभाग |
| २ | श्री र.व.गुरव ,उ.स. | सामान्य प्रशासन विभाग | कृषी व पदुम विभाग |
| ३ | श्रीमती न.नं.पाटील,स.स. | वित्त विभाग | उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग |
| ४ | श्री र.आ.नागरगोजे,उ.स. | वित्त विभाग | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| ५ | श्री मो.का.भोये,स.स. | ग्रामविकास व जलसंधारण विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४ (५) मधील तरतूदीनुसार मंत्रालयीन संवर्गातील खाली नमूद केलेल्या उप सचिवांच्या बदल्या करण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या विभागामध्ये त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे. -

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचा विभाग | बदलीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.प्र.श.शेटे,उ.स. | नगर विकास विभाग | कृषी व पदुम विभाग |
| २ | श्री.भि.य.मंता,उ.स. | आदिवासी विकास विभाग | उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग |

२. वर नमूद केलेल्या अधिका-यांच्या बदल्यांची तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टिने पुढील सूचनांचे सर्व संबंधित विभांगानी कटाक्षाने पालन करावे.

(१) बदली झालेल्या अधिका-यांच्या संबंधित विभागाने पर्यायी अधिकारी हजर होण्याची प्रतिक्षा न करता त्या विभागातील अधिका-यांना (श्री.जाधव व श्री.शेटे वगळून) दि.०१.०६.२०१५ (म.पू.) रोजी कार्यमुक्त करावे.

(२) श्री. पां.जो.जाधव, उप सचिव व श्री. प्र.श.शेटये , उप सचिव यांना अनुक्रमे सा.प्र.विभाग व न.वि.विभागाने दिनांक ३०.०६.२०१५ (म.नं.) रोजी कार्यमुक्त करावे.

(३) अधिकारी बदलीच्या आदेशानुसार अन्य विभागातून कार्यमुक्त होवून रुजू होण्यासाठी विभागात आल्यानंतर त्यांना विनाविलंब हजर करुन घ्यावे. एखादया अधिका-याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ मंजूर करण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित विभागाला जबाबदार धरण्यात येईल.

(४) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिका-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

(५) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व अधिकाऱ्यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे व जास्तीत जास्त दि.३१.०५.२०१५ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. दि.०१. ०६.२०१५ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या विभागाकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या विभागात हजर झाल्यानंतर बदलीनंतरच्या विभागाने काढावे व तसा अहवाल सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. दि.०१.०६.२०१५ नंतरचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल. तसेच बदली केलेल्या अधिकाऱ्यांचे जास्तीत जास्त दि.३१.०५.२०१५ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने अदा करावयाचे असून दि.०१.०६.२०१५ पासूनचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे असल्याबाबत अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांनाही कळविण्यात येत आहे.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्याबाबत व त्यांना बदलीच्या विभागात हजर करून घेतल्याबाबत संबंधित विभागांनी या विभागास कळवावे.

४. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०५२९१२५५३९९१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: CN = Satish Karbhari Jondhale, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = GAD
Date: 2015.05.29 12:57:05 +05'30'

**( स.का.जोंधळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
३) अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई

४) अमुस/प्रधान सचिव/सचिव - संबंधित मंत्रालयीन विभाग

५) सह/उप सचिव/(आस्थापना) -संबंधित मंत्रालयीन विभाग

६) संबंधित अधिकारी , विभागामार्फत

७) **अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,**

त्यांना कळविण्यात येथे की, बदली केलेल्या अधिकाऱ्यांचे जास्तीत जास्त दि. ३१.०५.२०१५ पर्यन्तचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. दि..०१.०६.२०१५ पासूनचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८) **आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग, (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)**

त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या अधिकाऱ्यांचे दि.३१.०५.२०१५ पर्यन्तचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. त्यानंतरचे वेतन संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांने अदा केल्यास त्यांना याबाबत व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल व त्यांच्याविरुध्द नियमानुसार योग्य ती कारवाई करण्यात येईल

**९) निवड नस्ती कार्या.१४**